**एशियाटीक सोसायटी, मुंबई या संस्थेकडे असलेल्या दुर्मिळ ग्रंथ व हस्तलिखित यांचे डिजिटायझेशन करण्यासाठी निधी वितरीत करण्याबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्र शिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- संकिर्ण-२०२३/प्र.क्र.९६/साशि-५,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२.
दिनांक : १६ जून, २०२३.

**वाचा :** १) शासन निर्णय,उच्च व तंत्र शिक्षण विभाग,क्र.संकीर्ण-२०२१/प्र.क्र.१७/साशि-५,दि.०३.०६.२०२१.
२) शासन निर्णय,उच्च व तंत्र शिक्षण विभाग,क्र.पूरक-२०२१/प्र.क्र.७८/साशि-५,दि.२०.०८.२०२१.
३) शासन निर्णय,उच्च व तंत्र शिक्षण विभाग,क्र.पूरक-२०२१/प्र.क्र.८१/साशि-५,दि.३०.०९.२०२२.
४) शासन निर्णय,उच्च व तंत्र शिक्षण विभाग,क्र.पूरक-२०२१/प्र.क्र.८१/साशि-५,दि.१४.०३.२०२३.
५) शासन परिपत्रक वित्त विभाग क्र.अर्थसं-२०२३/प्र.क्र.४०/अर्थ-३, दि.१२.०४.२०२३.
६) ग्रंथालय संचालक, ग्रंथालय संचालनालय, मुंबई यांचे पत्र जा.क्र.३४/एसोमुं/२०२३-२४/६२६, दि.०३.०५.२०२३.

**प्रस्तावना :**

एशियाटिक सोसायटी, मुंबई या संस्थेकडे असलेल्या दुर्मिळ ग्रंथ व हस्तलिखित यांचे डिजीटायजेशन करण्यासाठी रु.५,००,००,०००/- ( अक्षरी रुपये पाच कोटी फक्त ) निधी उपलब्ध करुन देण्यास संदर्भाधिन दि. ०३.०६.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात आली आहे. यानुषंगाने संदर्भाधीन दि.२०.०८.२०२१ रोजीच्या शासन निर्णयान्वये रु.१,००,००,०००/- (अक्षरी रुपये एक कोटी फक्त), दि.३०.०९.२०२२ रोजीच्या शासन निर्णयान्वये रु.५०,००,०००/- (अक्षरी रुपये पन्नास लक्ष फक्त) आणि दि.१४.०३.२०२३ रोजीच्या शासन निर्णयान्वये रु.२०,००,०००/- (अक्षरी रुपये वीस लक्ष फक्त) इतका निधी वितरीत करण्यास मान्यता देण्यात आली आहे. आता एशियाटिक सोसायटी, मुंबई या संस्थेकडे असलेल्या दुर्मिळ ग्रंथ व हस्तलिखित यांचे डिजीटायजेशन करण्यासाठी रु.१०,००,०००/- (अक्षरी रुपये दहा लक्ष फक्त) इतका निधी वितरीत करण्यास मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

एशियाटिक सोसायटी, मुंबई या संस्थेकडे असलेल्या दुर्मिळ ग्रंथ व हस्तलिखित यांचे डिजीटायजेशन करण्यासाठी रु.१०,००,०००/- (अक्षरी रुपये दहा लक्ष फक्त) इतका निधी वितरीत करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

**०२.** उपरोक्त खर्च करताना वित्त विभागाने वेळोवेळी निर्गमित केलेल्या शासन निर्णय/परिपत्रकांतील सूचनांचे पालन करण्यात यावे.

**०३.** सदर खर्च क्र.डब्लू-४, २२०५, कला व संस्कृती, १०५ सार्वजनिक ग्रंथालये, (०३) मध्यवर्ती, जिल्हा व तालुका ग्रंथालयांना सहाय्य, (०३) (१०) एशियाटीक सोसायटी, मुंबई ग्रंथालयाच्या सर्वागिण विकास (कार्यक्रम) (२२०५ ३४७५ ) ३१ सहायक अनुदाने (वेतनेतर या लेखाशिर्षांतर्गत उपलब्ध निधीतून भागविण्यात यावा.

**०४.** या रकमेची उपयोगिता प्रमाणपत्रे संबंधितांनी विहित मुदतीत सादर करणे आवश्यक राहील.

**०५.** एशियाटिक सोसायटी, मुंबई या संस्थेने या योजने अंतर्गत केलेल्या कामाचा कामाचा अहवाल ग्रंथालय संचालक, ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांना सादर करावा. तसेच ग्रंथालय संचालक यांनी एशियाटिक सोसायटी, मुंबई या संस्थेने केलेल्या कामाचा आढावा घेऊन त्याबाबतचा अहवाल शासनास सादर करावा.

**०६.** सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०२३०६१६१८४२००७६०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

MANALI MILIND SAMANT

Digitally signed by MANALI MILIND SAMANT
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HIGHER AND TECHNICAL EDUCATION DEPARTMENT, 2.5.4.20=e4e402a7e3426729716afaf506c8f4a9d1528c744234b2ca1302837eaee0ebdd, postalCode=400032, st=Maharashtra, serialNumber=C63B0A0419F0EB37099DACA08E4CCCCE3BF49154BF43E8881E68AC2CA3A46392, cn=MANALI MILIND SAMANT
Date: 2023.06.16 18:43:49 +05'30'

**( मनाली सामंत )**
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१. मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव, राजभवन, मुंबई
२. मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे प्रधान सचिव,मंत्रालय, मुंबई
३. मा. उपमुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य यांचे सचिव, मंत्रालय, मुंबई
४. मा. मंत्री, उच्च व तंत्र शिक्षण विभाग यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
५. प्रधान सचिव, उच्च व तंत्र शिक्षण विभाग,मंत्रालय,मुंबई
६. प्रधान सचिव, नियोजन/वित्त विभाग,मंत्रालय,मुंबई
७. महालेखापाल-१ (लेखापरीक्षा/लेखा व अनुज्ञेयता), मुंबई
८. अध्यक्ष, एशियाटीक सोसायटी, नगर भवन, मुंबई.
९. ग्रंथालय संचालक, ग्रंथालय संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
१०. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
११. निवासी लेखापरीक्षा अधिकारी, मुंबई.
१२. कक्ष अधिकारी ( साशि-१ ), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय, मुंबई.
१३. निवडनस्ती (साशि-५), उच्च व तंत्र शिक्षण विभाग, मंत्रालय,मुंबई.